सन २०१४-१५ मधील मंजूर अर्थसंकल्पीत तरतूदीचे वितरण करणेबाबत.
शेतक-यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य (योजनेत्तर) (२४२५१५०१).

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अर्थस ०९१४ / प्र.क्र.१४७ /२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च २०१५

**वाचा :-**
**१. शासन निर्णय क्रमांकः सीसीआर १४०६/प्र.क्र २४७/ २-स, दि. १७.५.२००६**
**२. नाबार्ड यांचे पत्र क्र.एन.बी.डीवोआर.एस.टी.पॉलिसी/९४/ए-१(जन).(आरपी/१४-१५), दि.०७.०४.१४.**
**३. शासन निर्णय क्रमांकः : सीसीआर ०४१३/प्र.क्र १७६/२-स दि.३१.१०.२०१३.**
**४. शासन निर्णय क्रमांकः अर्थस ०९१४ / प्र.क्र.१४७ /२-स, दि. २९.१.२०१५.**
**५. शासन निर्णय क्रमांक अर्थस ०९१४ / प्र.क्र.१४७ /२-स, दि. २५.३.२०१५.**

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतक-यांना ६% व्याजदराने अल्पमुदत पीककर्ज पुरवठा होण्यासाठी शासकीय अर्थसहाय्याचा निर्णय घेतलेला आहे. या निर्णयानुसार, केंद्र शासनाचे धोरणानुसार बँका ज्या ज्या ठिकाणी शेतक-यांना ७% व्याज दराने कर्जपुरवठा करणार आहेत, त्या त्या ठिकाणी बँकांनी ७ % ऐवजी शेतक-यांना ६ % व्याजदराने कर्जपुरवठा करावा असे राज्यशासनाचे धोरण आहे. या प्रयोजनासाठी १% व्याज फरकाच्या रक्कमेचा आर्थिक भार राज्य शासन सोसणार आहे. या निर्णयाचा फायदा सन २००६-०७ पासुन खरीप व रब्बी हंगामा मध्ये राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, राष्ट्रीयकृत बँका आणि प्रादेशिक ग्रामीण बँका व सन २०१३-१४ पासून खाजगी बँका यांच्याकडून शेतक-यांना रुपये ३ लाखापर्यंत अल्पमुदत पीक कर्ज वाटप करणा-या बँकाना देण्यात येत आहे.

या योजनेखाली मंजूर तरतूद रु. १५०.०० कोटी पैकी रु. ३३.०३ कोटी एवढा निधी वितरणाचे आदेश वरील वाचा येथील दि.२९/१/२०१५ या शासन निर्णयान्वये व रु. ८६.९७ कोटी एवढा निधी वितरणाचे आदेश वाचा येथील दि. २५.०३.२०१५ या शासन निर्णयान्वये निर्गमित झालेले असून त्याप्रमाणे अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणाली व्दारे निधी वितरीत करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षासाठी शेतक-यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य योजनेखाली रू. १५०.०० कोटी अर्थसंकल्पित तरतूद मंजूर असून वित्त विभागाच्या सहमतीने मंजूर तरतूदीच्या १०० टक्के रू. १५०.०० कोटी खालील प्रमाणे निधीचे वितरण करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

हया योजनेखाली मंजूर अर्थसंकल्पित निधीच्या एकूण वार्षिक **तरतूदीच्या १०० टक्केच्या मर्यादेत** वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असून रु.१५०.०० कोटी पैकी वित्त विभागाच्या सहमतीने रु.३३.०३ कोटी एवढया निधीचे वितरण दि. २९/१/२०१५ शासन निर्णयान्वये रु.८६.९७ कोटी एवढया निधीचे वितरण दि. २५/३/२०१५ एवढा निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणाली व्दारे वितरीत करण्यात आला आहे. **उर्वरीत रू. ३०.०० कोटी (रू. तीस कोटी फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणाली व्दारे वितरीत करण्यात येत आहे.**

सदर तरतूद संबंधित बँकांना अदा करण्यासाठी अप्प आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - १०७, सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) (१०) शेतक-यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य. (योजनेत्तर) (दत्तमत्त) (२४२५१५०१) ३३ अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०१४-१५ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १९३/१५/व्यय-२, दिनांक ३१.०३.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०४१५४७४३१६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: CN = Santosh Arun Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Co-operation marketing and textiles department
Date: 2015.04.04 15:57:27 +05'30'

**(संतोष पाटील)**
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत**

माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री / राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव (सर्व).
३. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व विभागीय आयुक्त.
६. मुख्य महाव्यवस्थापक, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, ॲग्रीकल्चर क्रेडिट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफीस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.
७. मुख्य महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुणे.

८. सरव्यवस्थापक, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, ॲग्रीकल्चर क्रेडिट डिपार्टमेंट, बॉम्बे रिजनल ऑफीस,मुंबई-१८.
९. सहसचिव, भारत सरकार कृषि मंत्रालय (सहकार विभाग) कृषिभवन, नवी दिल्ली.
१०. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
११. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
१२. अध्यक्ष, बँक ऑफ महाराष्ट्र व अग्रणी बँक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक. लि. मुंबई.
१४. कार्यकारी संचालक, सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका.
१५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
१६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१७. सर्व सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था.
१८. मुख्य संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१९. नियोजन विभाग, कार्या - १४११/कार्या-१४३१, मंत्रालय, मुंबई
२०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३ ,मंत्रालय, मुंबई
२२. कृषि व पदुम विभाग, (कृषि) मंत्रालय,मुंबई
२३. कोषागार अधिकारी, पुणे.
२४. निवड नस्ती-२-स.